**श्री.चंद्रशेखर सुधाकर बाहकर यांची महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य,सामान्य राज्य सेवा,गट-अ या पदावर नियुक्तीबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमाक.एजीओ-२२१८/प्र.क्र.८९/का-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.

**दिनांक ०१ नोव्हेंबर, २०१८.**

**संदर्भ:-** महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे गोपनीय पत्र क्र. १३२२/५८०४/आठ,दि.०६.०९.२०१८.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून संदर्भाधीन पत्रान्वये महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्य सेवा, गट-अ या पदावर नियुक्तीकरिता प्रतीक्षायादीतून गुणवत्ता क्रमानुसार श्री.चंद्रशेखर सुधाकर बाहकर (अराखीव) यांची शिफारस करण्यात आली आहे. यास्तव श्री.चंद्रशेखर सुधाकर बाहकर यांची महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्य सेवा, गट-अ या पदावर रु.३७४००-६७००० + ग्रेड पे रु.८७०० या वेतनबँडमध्ये नियुक्ती व पदस्थापना करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. श्री.चंद्रशेखर सुधाकर बाहकर यांची महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्य सेवा, गट-अ या पदावर महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ मधील नियम ९ (४२) मध्ये विहीत केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याखेनुसार तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

३. महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्य सेवा गट-अ, या पदावरील त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून २ वर्षाचा कालावधी हा परिविक्षाधीन कालावधी म्हणून समजण्यात येईल.

४. या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या कालावधीत त्यांनी नियुक्ती स्विकारणे आवश्यक आहे. प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांच्याकडून काहीही कळविण्यात न आल्यास या विभागाच्या निवड यादीवरुन त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता काढून टाकण्यात येईल.

**५.** श्री.चंद्रशेखर सुधाकर बाहकर यांनी त्यांच्या नियुक्तीच्या पदावर रुजू होण्यासाठी प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या कार्यालयात उपस्थित रहावे. तसेच महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्य सेवा, गट-अ या पदावर सध्या प्रतिनियुक्तीने कार्यरत असलेले न्यायिक अधिकारी श्री.सतिश गो. अडके यांची सेवा न्यायिक सेवेत प्रत्यावर्तित झाल्यावर आपणांस महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्य सेवा, गट-अ या पदावर नियुक्त करण्यात येईल.

**६.** श्री.चंद्रशेखर सुधाकर बाहकर यांची नियुक्ती या शासन निर्णयासोबत जोडलेल्या सहपत्रामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

**७.** या प्रित्यर्थ येणारा खर्च "२०१४ न्यायदान (११०) - महाप्रशासक व शासकीय विश्वस्त वेतन" (मागणी क्र.जे-१) संकेतांक क्र.२०१४-२०५२-०१ या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली टाकण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८११०११६४७२५९११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Digitally signed by Mahendra Shantaram Pujari
Date: 2018.11.01 16:55:09 +05'30'

**(महेंद्र पुजारी)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव,
३. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा व परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई ,
६. महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई ,
७. सह सचिव(प्रशासन), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०.श्री.चंद्रशेखर सुधाकर बाहकर, मु.पो.खंडाळा, ता तेल्हारा, जि. अकोला-४४४१०३,
११.निवडनस्ती.

**शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.एजीओ-२२१८/प्र.क्र.८९/का-१, दिनांक:०१.११.२०१८चे सहपत्र.**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार नामनिर्देशनाने श्री.चंद्रशेखर सुधाकर बाहकर यांची महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्य सेवा, गट-अ या पदावर नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे:-

(१) महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्यसेवा गट-अ या पदावरील नियुक्ती वेतनश्रेणी रु. ३७४००-६७००० + ग्रेड वेतन रु. ८७०० व इतर भत्ते या वेतनबँडमध्ये करण्यात येत आहे.

(२) उमेदवार विवाहीत असल्यास त्यास एकापेक्षा अधिक पती/पत्नी असू नयेत.

(३) त्यांचे वेतन व भत्ते महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ प्रमाणे निश्चित करण्यात येतील.

(४) शासनाने विहित केलेल्या हिंदी व मराठी परीक्षा त्यांना उत्तीर्ण कराव्या लागतील.

(५) महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणे/वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम १९९९ अन्वये सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक ७ ऑगस्ट, २००१ व दिनांक २९ मार्च, २००३ नुसार संगणकाच्या ज्ञानासंबंधी आवश्यक संगणक अर्हता प्राप्त न केल्यास त्यांनी संगणक अर्हता त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षाचे आत प्राप्त करणे आवश्यक राहील अन्यथा त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

(६) या सेवेत असताना त्यांना खाजगी व्यवसाय करता येणार नाही किंवा आर्थिक लाभाचे कामही करता येणार नाही.

(७) त्यांनी नोकरी सोडताना शासनास एक महिन्याची पूर्व सूचना देणे आवश्यक आहे.पूर्वसूचना न दिल्यास, त्यांच्याकडून एक महिन्याचे वेतन वसूल करण्यात येईल.

(८) उमेदवाराने नियुक्तीचे आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत सेवेत रुजू होणे आवश्यक आहे. जर सदर पदावर रुजू होण्यास मुदतवाढ आवश्यक असेल तर तशी शासनाकडून लेखी पूर्व परवानगी घेणे बंधनकारक आहे.

(९) परिविक्षाधीन कालावधीत संबंधित उमेदवार महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्यसेवा, गट-अ, या पदाच्या कामाचा अपेक्षित दर्जा साध्य करु शकले नाहीत, तसेच त्यांची वर्तणूक असमाधानकारक किंवा गट-अ च्या अधिकाऱ्यास अशोभनीय आढळल्यास त्यांची सेवा समाप्त करण्यात येईल.

(१०) महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्यसेवा, गट-अ यांना नियुक्तीच्या दिनांकापासून राज्य शासकीय गट विमा योजना १९८२ चे सदस्य म्हणून दाखल करुन घेण्यात येत आहे. गट विमा योजनेच्या नियमानुसार त्यांची गट विमा योजनेची वर्गणी नियुक्तीच्या दिनांकापासून वजाती करण्यात यावी.

(११) महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्यसेवा गट-अ यांनी

(१) त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत स्वग्राम घोषित करावे.

(२) परिभाषित अंशत: निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत निवृत्तीवेतन, गटविमा योजना इत्यादी संबंधीची नामनिर्देशन पत्रे त्वरित सादर करावीत.

(३) मालमत्ता व दायित्व यासंबंधीची प्रपत्रे त्वरित भरुन द्यावीत.

(१२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अंनियो १००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१/१०/२००५ अन्वये महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, सामान्य राज्यसेवा गट-अ यांना नवीन "परिभाषिक अंशदान निवृत्ती योजना " लागू ठरेल याकरिता त्यांनी सदर शासन निर्णयातील परिच्छेद ३ (ड) नुसार विकल्प त्वरित सादर करावा. मात्र सध्या अस्तित्वात असलेली निवृत्ती वेतन योजना म्हणजेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम,१९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ आणि सध्या अस्तित्वात असलेली सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना त्यांना लागू होणार नाही.

(१३) नियुक्ती दिलेले जे उमेदवार अगोदरच शासन सेवेत कार्यरत आहेत, त्यांची सध्याची वर्तणूक अशोभनीय असल्याचे भविष्यकाळात निदर्शनास आल्यास, त्यांची नियुक्ती कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

(१४) संबंधित उमेदवाराने नियुक्ती स्विकारण्यासाठी करावा लागणारा प्रवासखर्च तसेच निवासस्थानाची व्यवस्था स्वत: करणे आवश्यक आहे. त्यासाठी मुदतवाढ दिली जाणार नाही.

(१५) वरील उमेदवार ज्या दिवशी हजर होईल त्या दिनांकापासून नियमाप्रमाणे त्यांचे वार्षिक गोपनीय अहवाल वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयानुसार लिहिण्यात येतील.

----------------